GR 200407281209200001-1100

आजारी लघु उद्योगांच्या पुनरुज्जीवनासाठी ज्या कार्यप्रणालीद्वारे सोयी सवलती देण्यात येतात त्यांमध्ये सुधारणा करणे.

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: एसयुसी-1096/(604)/उद्योग-10,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 14 मे, 1996.

वाचा:- शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक: एसयुसी-1088/(899)/उद्योग-10, दिनांक 26 मार्च 1992.

प्रस्तावना:- पुनरुज्जीवन योजनेद्वारे राज्य शासनाकडून आजारी लघु उद्योगांना देण्यात येणा-या सोयी सवलतींबाबतची कार्यप्रणाली संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे निश्चित करण्यात आली होती. त्यानुसार सोयी सवलती मंजूर करण्यासाठी राज्य/विभागीय पातळीवर समित्या स्थापन करण्यात आल्या होत्या. त्याबाबत आढावा घेतला असता फारच थोडया आजारी लघु उद्योगांना त्याचा फायदा झाल्याचे निदर्शनास आले आहे. सीमित फलनिष्पत्तीची कारणे खालीलप्रमाणे आहेत :-

1) विलंबकारी कार्यपध्दती.
2) वित्तीय संस्था/बँक यांना पुनरुज्जीवन योजना तयार करतेवेळी राज्य शासनातर्फे मिळणा-या सोयी सवलतींबाबत अनभिज्ञता असणे किंवा खात्री नसणे.

शासन निर्णय :- शासन आता असा निर्णय घेत आहे की, राज्य शासनातर्फे आजारी लघु उद्योग घटकांना देण्यात येणा-या सोयी सवलती अगोदरच जाहीर केल्यास त्याची दखल वित्तीय संस्था/बँक पुनरुज्जीवन योजना बनविताना घेऊ शकतील म्हणून कार्यप्रणालीत बदल करण्यात येत आहे. त्याची प्रमुख वैशिष्टये खालीलप्रमाणे आहेत :-

अ) संबंधित आजारी लघु उद्योगाला वित्तीय सहाय्य करणा-या वित्तीय संस्था/बँक यांनी बनविलेल्या पुनरुज्जीवन योजनेत राज्य शासनातर्फे खालीलप्रमाणे सोयी सवलती देण्यात येतील. शुश्रुषा कार्यक्रम अंमलात येण्याच्या दिनांकादिवशी राज्य शासनाची सर्व देणी म्हणजेच विक्रीकर, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाच्या थकबाकीची मूळ रक्कम, व्याज व दंडनीय व्याज इत्यादींसह जी एकूण रक्कम होईल ती सर्व रक्कम थकबाकी म्हणून समजण्यात यावी. आजारी घटकाने ही संपूर्ण थकबाकी जास्तीत जास्त 36 मासिक हप्त्यांमध्ये व त्यावर 13% वार्षिक व्याजाने परतफेड करणे आवश्यक आहे.

ब) आजारी औद्योगिक घटकाला वित्तीय सहाय्य करणा-या बँक/वित्तीय संस्थांनी संबंधित आजारी उद्योग घटकाकरिता शुश्रुषा कार्यक्रमाअंतर्गत पुनरुज्जीवन योजनेचा प्रस्ताव, त्यामध्ये योजना सुरू होण्याच्या दिनांकासह योजनेचा कालावधी नमूद करून संबंधित उद्योग केंद्राच्या महाव्यवस्थापक/जिल्हा उद्योग केंद्राच्या अधीक्षकीय उद्योग अधिका-यांकडे सादर करावा.

क) उपरोक्त प्रस्ताव महाव्यवस्थापक/जिल्हा उद्योग केंद्राच्या अधीक्षकीय उद्योग अधिका-यांकडे प्राप्त झाल्यानंतर त्यांनी (शक्य तो एक आठवडयाच्या आत) सदर औद्योगिक घटकास "आजारी उद्योग प्रमाणपत्र" योजना सुरू होणा-या दिनांकासह योजनेचा कालावधी नमूद करून द्यावे.

आजारी उद्योग प्रमाणपत्र मिळविणा-या लघु उद्योगास उपरोक्त (अ) येथे नमूद केलेल्या सोयी सवलती आपोआप प्राप्त होतील.

रोटा/एच-114(5,000-5-96)

(पुढे चालू..

ड) या शासन निर्णयाद्वारे कार्यप्रणालीत केलेल्या सुधारणेप्रमाणे संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे गठीत केलेल्या राज्य/विभागीय पातळीवरील समित्या अनावश्यक असल्याने रद्द करण्यात येत आहेत. शासन निर्णय कमांक: एसयुसी-1088/(899)/उद्योग-10, दिनांक 26.3.92 या आदेशाद्वारे अधिक्रमित झाला आहे.

इ) आजारी उद्योग प्रमाणपत्राची प्रत विकास आयुक्त (उद्योग) यांना अग्रेषित करावी, की जेणेकरून उद्योग संचालनालयामध्ये स्थापन करण्यात आलेल्या "आजारी उद्योग कक्ष" द्वारे सोयी सवलतींबाबतच्या कार्यप्रणालीवर नियंत्रण राहील.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक 2046/दिनांक 25.1.96 च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत असून शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शेखर ढवळे,
कार्यासन अधिकारी.

प्रत:-

प्रधान सचिव, वित्त विभाग,
प्रधान सचिव, (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
सचिव, वित्त मंत्रालय (बँकींग विभाग) भारत सरकार, नवी दिल्ली,
सचिव, उद्योग मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली,
गव्हर्नर, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
विक्रीकर आयुक्त/विभागीय विक्रीकर उप आयुक्त,
मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव,
राज्यमंत्री (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,
सर्व उद्योग सह संचालक/सर्व अधीक्षकीय उद्योग अधिकारी, सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्रे,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम,
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, प्रकाशगड, बांद्रा, मुंबई,
सर्व संबंधित बँकांचे व्यवस्थापकीय संचालक,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क,
उद्योग विभागांतर्गत सर्व महामंडळे/उद्योग मित्र,
सर्व मंत्रालयीन विभाग,
उद्योजकांच्या संघटना,
निवड नस्ती.